**भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने पारित केलेला महासभा ठराव क्र.७६, दिनांक १२.०७.२०१८ अंशंत: विखंडीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :- भिनिम-२०१८/व्हीआयपी.६७/नवि-२३**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- २७ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :** -

मा.श्री.महेश चौघुले, आमदार, भिवंडी (पश्चिम) यांचे दिनांक १६.०७.२०१८ तसेच श्री.श्याम मनसुखराय अग्रवाल यांच्या दिनांक १६.०७.२०१८ च्या पत्रात भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेत महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ च्या तरतुदींनुसार नियुक्त करावयाचे नामनिर्देशित सदस्यांच्या नियुक्तीसंदर्भात तक्रार केली व तद्नुषंगाने आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी अहवाल दिनांक ०६.०९.२०१८ च्या पत्रान्वये सादर केला आहे.

या प्रकरणी खालील बाबी निदर्शनास येतात:-

- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५ (२) (ब) नुसार महानगरपालिकांमध्ये पालिका प्रशासनाचे विशेष ज्ञान किंवा अनुभव असलेल्या पाच पेक्षा जास्त नाही इतक्या सदस्यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याची तरतुद आहे.
- महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ कलम ३ नुसार सार्वत्रिक निवडणुकीनंतर निवडणुकांचे निकाल अधिसूचित झाल्याच्या दिनांकापासून १ महिन्यानंतर लगतच घेण्यात येणाऱ्या महापालिकेच्या बैठकीत पाच व्यक्तींचे नामनिर्देशन, नामनिर्देशित पालिका सदस्य म्हणून करण्याचे महापालिकेस अधिकार आहेत.
- महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ कलम ४ नुसार नामनिर्देशित करावयाच्या सदस्यांची अर्हता निश्चित करण्यात आली आहे.
- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ५ (२) नुसार तसेच महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ च्या तरतुदीनुसार भिवंडी निजामपुर शहर महानगरपालिकेच्या महासभेतील संख्याबळानुसार खालीलप्रमाणे पक्षनिहाय सदस्य संख्या निश्चित करण्यात आली.

| अ.क्र | पक्ष | सदस्यांची संख्या |
|---|---|---|
| १ | शिवसेना | १ |
| २ | भारतीय जनता पार्टी | १ |
| ३ | कोणार्क विकास आघाडी | ० |
| ४ | भारतीय राष्ट्रीय काँग्रेस | ३ |
| **एकूण** | | **५** |

- महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे नियम ४ (क) ते ४ (छ) नुसार पालिका प्रशासनाचे विशेष ज्ञान असणारी व्यक्ती नामनिर्देशित पालिका सदस्याच्या पदासाठी उमेदवार म्हणून नामनिर्देशित केली जाण्यास पात्र आहे. वैद्यकीय व्यवसायी, शिक्षणतज्ञ, सनदी लेखापरिक्षक, अभियांत्रिक पदवीधारक, अभिवक्ता, नगरपरिषदेचे मुख्याधिकारी, महानगरपालिकेचे सहायक आयुक्त, समाज कल्याण कार्यात गुंतलेल्या अशासकीय संघटनेचे पदाधिकारी यांची नियुक्ती नामनिर्देशित सदस्य म्हणून करता येईल.
- महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे नियम ५ नुसार दिनांक १३.०४.२०१८ रोजी बैठकीत कलम ४ (घ) व ४ (छ) असे २ प्रवर्गातील नावे निश्चित करण्यात आली.
- तद्नुषंगाने उक्त बैठकीतील चर्चेनुसार आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी तौलनिक संख्याबळ व संबंधित राजकीय पक्षाच्या शिफारशीनुसार ॲड.श्री.हर्षद प्रमोद पाटील यांची भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेवर महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे नियम, ४ (ड) नुसार नामनिर्देशन करण्याची शिफारस महासभेस केली.
- तसेच आयुक्तांनी श्री. मोह. साजिद अशफाक खान, श्री.सिद्धेश्वर कामुर्ती, श्री.राहूल छगन खटके या तीन उमेदवारांमधून महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे नियम, ४ (छ) नुसार एका सदस्याची नामनिर्देशित सदस्य म्हणुन महासभेस शिफारस केली.
- परंतु ठराव क्र. ७६, दिनांक १२.०७.२०१८ नुसार भिवंडी निजामपुर शहर महानगरपालिकेच्या महासभेवर नामनिर्देशित सदस्य म्हणुन करावे असा निर्णय घेतला:-

| अ.क्र. | नाव | महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ |
|---|---|---|
| १ | ॲड.श्री.हर्षद प्रमोद पाटील | ४ (ड) |
| २ | श्री.मोह. साजिद अशफाक खान | ४ (छ) |
| ३ | श्री.सिद्धेश्वर कामुर्ती | ४ (छ) |
| ४ | श्री.राहूल खटके | ४ (छ) |
| ५ | श्री.देवानंद रुपचंद थळे | ४ (छ) |

परंतु या ठरावातील नामनिर्देशाने नियुक्त संदर्भात केवळ ॲड.श्री.हर्षद प्रमोद पाटील यांची नियुक्ती ४ (ड) नुसार करता येणार असल्याचे अभिप्राय आयुक्त, भिवंडी निजामपुर शहर महानगरपालिका यांनी दिले आहेत.

परंतु, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेने उक्त तीनही उमेदवारांची (श्री.मोह. साजिद अशफाक खान, श्री.सिद्धेश्वर कामुर्ती, श्री.राहूल छगन खटके) नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याचा निर्णय घेतला. उक्त निर्णय महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे कलम ४ व नगर विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०१०/ प्र.क्र.८५/नवि-३२, दिनांक ०६.०७.२०१० नुसार नियमातील तरतुदींनुसार नाही.

- तसेच श्री.देवानंद रुपचंद थळे यांचे नामनिर्देशन नियम ४(छ) शी सुसंगत नसल्याने आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी महासभेस श्री.थळे यांच्या नामनिर्देशनाने नियुक्तीकरीता शिफारस केली नाही.

  परंतु, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेने श्री.थळे यांची नामनिर्देशनाने नियुक्त करण्याचा निर्णय घेतला.

  सदर निर्णय महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे कलम ४ व नगर विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०१०/प्र.क्र.८५/नवि-३२, दिनांक ०६.०७.२०१० तरतुदींनुसार नाही.

- तसेच महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियम, २०१२ चे कलम ५(२) नुसार आयुक्तांची शिफारस अमान्य करताना त्याबाबतची कारणमीमांसा पालिकेने नोंद केलेली नसल्याचे आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी कळविले आहे.

अ‍ॅड.श्री.हर्षद प्रमोद पाटील यांची नामनिर्देशीत सदस्य म्हणुन भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेवरील नियुक्ती अधिनियम /नियम /परिपत्रकातील तरतुदीनुसार असल्याने त्यांच्या उक्त पदावरील नियुक्तीस बाधा नाही.

मात्र श्री.मोह. साजिद अशफाक खान, श्री.सिद्धेश्वर कामुर्ती, श्री.राहूल छगन खटके व श्री.देवानंद रुपचंद थळे यांच्या नामनिर्देशीत सदस्य म्हणुन भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेवरील नियुक्ती अधिनियम/नियम/परिपत्रकातील तरतुदीनुसार नसल्याने उक्त ठराव त्याच्या नियुक्तीकरीता अंशत: विखंडीत करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र महानगरपालिकेच्या अधिनियमाच्या कलम ४५१(१) नुसार हा अधिनियम अथवा त्यावेळी अंमलात असलेला इतर कोणताही कायदा याद्वारे किंवा तद्अन्वये देण्यात आलेल्या अधिकाराच्या विरुध्द किंवा मर्यादेबाहेर आहे, असे राज्य शासनाचे मत झाल्यास उक्त ठराव निलंबित किंवा विखंडीत करण्याचा अधिकार राज्य शासनास प्राप्त आहेत.

आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी सादर केलेली वस्तुस्थिती व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम आणि महाराष्ट्र महानगरपालिका (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या) नियमाच्या तरतुदी विचारात घेऊन शासन आता खालील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

श्री.मोह. साजिद अशफाक खान, श्री.सिद्धेश्वर कामुर्ती, श्री.राहूल छगन खटके व श्री.देवानंद रुपचंद थळे यांचा नामनिर्देशीत सदस्य म्हणुन भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेवर नियुक्तीचा भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेचा ठराव क्र. ७६ दिनांक

१२.०७.२०१८ प्रचलित नियम/परिपत्रकातील तरतुदींच्या विपरीत असल्याने महाराष्ट्र महानगरपालिकेच्या अधिनियमाच्या कलम ४५१ (१) नुसार प्राप्त अधिकारात श्री.मोह. साजिद अशफाक खान, श्री.सिद्धेश्वर कामुर्ती, श्री.राहूल छगन खटके व श्री.देवानंद रुपचंद थळे यांच्या नामनिर्देशीत सदस्य म्हणुन नियुक्ती निर्णयापुरता अंशत: निलंबित करण्यात येत आहे.

ॲड.श्री.हर्षद प्रमोद पाटील यांची नामनिर्देशीत सदस्य म्हणुन भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या महासभेवरील नियुक्ती अधिनियम / नियम /परिपत्रकातील तरतुदीनुसार असल्याने त्यांची उक्त पदावरील नियुक्ती या निलंबनाने बाधीत होणार नाही.

महाराष्ट्र महानगरपालिकेच्या अधिनियमाच्या कलम ४५१ (२) नुसार याबाबतीत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत शासनास अभिवेदन करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८११२८१६३४२०४१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2018.11.28 16:38:44 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) उप सचिव (श्री.शंकर जाधव), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका, भिवंडी, जि.ठाणे
६) महापालिका सचिव, भिवंडी-निजामपूर शहर महानगपालिका, भिवंडी, जि.ठाणे
७) निवड नस्ती (नवि-२३) नगर विकास विभाग.